**मा.सर्वोच्च न्यायालय,नवी दिल्ली व मा.उच्च न्यायालय,मुंबई यांनी दिलेल्या आदेशानुसार अर्जदारांना व्याजाची रक्कम अदा करणेसाठी नोंदणी व मुद्रांक विभागाच्या स्वीय प्रपंजी लेख्यातून (PLA) एक विशेष बाब म्हणून खर्च करण्यास मान्यता देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: मुद्रांक-२०२५/प्र.क्र.१४/म-१(धोरण)**
दालन क्र.एम-७ ए, पोटमाळा, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई-४०००३२
दिनांक :२५ एप्रिल,२०२५

वाचा : १) शासन ज्ञापन क्रमांक : आस्थापना -२००१/प्र.क्र.४१०/म-१, दि.३१.१०.२००१
२) शासन निर्णय क्रमांक: नोंदणी (संगणक)-२०१५/१५१७/प्र.क्र.४५२/म-१, दि.०८ ऑक्टोबर, २०१५.
३) शासन शुध्दीपत्रक क्र.मुद्रांक-२०१४/३२६६/प्र.क्र.५०४/म-१(धोरण), दि.११.१.२०२१
४) महसूल व वन विभाग,शासन निर्णय क्र.मुद्रांक-२०२५/प्र.क्र.१४/म-१(धोरण),दि.१३.३.२०२५
५) महसूल व वन विभाग,शासन निर्णय क्र.मुद्रांक-२०२५/३१४/प्र.क्र.१९/म-१(धोरण),दि.१३.३.२०२५
६) महसूल व वन विभाग,शासन निर्णय क्र.याचिका-२०१४/प्र.क्र.४३५/म-१(धोरण),दि.१३.३.२०२५
७) नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, यांचे पत्र क्र. जा.क्र.का-०८/नोंमनि/लेखा/परतावा व्याज रक्कम /अनुदान/९६/२०२५, दि.१८.३.२०२२

**प्रस्तावना:-**

महसूल व वन विभाग,शासन ज्ञापन दिनांक ३१.१०.२००१ अन्वये नोंदणी व मुद्रांक विभागाचे बांधा, वापरा, हस्तांतरण करा या तत्वावर संगणकीकरण करण्यासाठी "स्वीय प्रपंजी लेखे उघडण्यास मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ क्र. ४ अन्वये निर्गमित केलेल्या शासन निर्णयात निर्धारित केलेल्या "स्वीय प्रपंजी लेख्यात" जमा होणाऱ्या रकमेतून शासनाच्या पूर्व मान्यतेशिवाय दरमहा खर्च करण्याची मर्यादा रु. १० कोटी इतक्या रकमेच्या मर्यादेपर्यंत वाढविण्यात आली आहे.

नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांचेकडून प्राप्त न्यायालयीन प्रकरणांमध्ये मा.सर्वोच्च न्यायालय,नवी दिल्ली व मा.उच्च न्यायालय,मुंबई येथे दाखल प्रकरणांमध्ये मा.न्यायालयाने दिलेल्या आदेशानुसार अर्जदारांना व्याजाची रक्कम अदा करणेबाबत वित्त विभागाच्या मान्यतेने संदर्भ क्र.४,५ व ६ येथील शासन निर्णय निर्गमित करण्यात आलेले आहे.

नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक,महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी दि.१८.३.२०२५ रोजीच्या पत्राव्दारे विनंती केल्यानुसार मा.सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली व मा.उच्च न्यायालय,मुंबई यांचेकडील दाखल प्रकरणांमध्ये मा.न्यायालयाच्या आदेशानुसार अर्जदारांना व्याजाची रक्कम अदा करणेसाठी नोंदणी व मुद्रांक विभागाच्या स्वीय प्रपंजी लेख्यातून (PLA) मधून "एक विशेष बाब " म्हणून खर्च करण्यास परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय:-</u>

नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांना स्वीय प्रपंजी लेख्यात जमा होणाऱ्या रकमेमधून दि.११.१.२०२१ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार मा.सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली व मा.उच्च न्यायालय,मुंबई यांचेकडील दाखल प्रकरणांमध्ये मा.न्यायालयाच्या आदेशानुसार अर्जदारांना व्याजाची रक्कम अदा करणेसाठी नोंदणी व मुद्रांक विभागाच्या स्वीय प्रपंजी लेख्यातून (PLA) मधून खर्च करण्यास "एक विशेष बाब " म्हणून या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च हा ज्या बाबींसाठी मंजूर करण्यात आला आहे. त्याच बाबींसाठी खर्च करण्यात यावा. खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्यात यावे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग, अनौ.संदर्भ क्र. २०२/व्यय-१०, दिनांक २९.३.२०२५ अन्वये प्राप्त सहमतीस अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२५०४२५१७५८०६९११९ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ

Digitally signed by SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=559498df564ab1121a356349085c1b8e3cc0f12569ba0f7f2090386d4dccb333, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F7145AF5949FB706E2DCB06C2B209B58FFA369F6E085E02041722C90F0528791, cn=SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
Date: 2025.04.25 18:00:05 +05'30'

**( सत्यनारायण बजाज )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री महोदयांचे सचिव,मंत्रालय,मुंबई
४. सर्व मा.मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
५. मा. सभापती. विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
६. मा. अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
७. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
८. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
९. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई
१०. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य,पुणे
११. अपर मुद्रांक नियंत्रक,प्रधान मुद्रांक कार्यालय, मुंबई
१२. महालेखापाल-१ व २ (मुंबई/नागपूर)महाराष्ट्र राज्य
१३. सर्व जिल्हाधिकारी
१४.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१५.निवडनस्ती कार्यासन म-१(धोरण), महसूल व विभाग, मंत्रालय,मुंबई